राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियनांतर्गत मंत्रालय स्तरावर नवीन पदनिर्मिती करणॆ बाबत

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पीएचडी ३००११/६८ /२०१४ आ-७, दि. ०३.०९.२०१४

बी. विंग, १० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१
तारीख: ०३ सप्टेंबर, २०१४

वाचा -

1) **शासन निर्णय क्रमांक :- रानाआ-२०१३ / प्र. क्र.२१७ /आ-७, सार्वजनिक आरोग्य विभाग दि. ०२.०६ .२०१४**
2) **शासन पृष्ठांकन क्रमांकः पदनि -२०१४/ प्र. क्र. ५१/१४/विसु-१, वित्त विभाग दि. ०४.०८.२०१४**

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान या नवीन केंद्रपुरस्कृत कार्यक्रमाची अंमलबजावणी सन २०१३-१४ मध्ये सुरू करण्यात आली असून संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयानुसार धोरणात्मक मंजूरी देण्यात आली आहे. सदर कार्यक्रमासाठी मंत्रीमंडळाने दि. २४.०२.२०१४ च्या बैठकीत एकूण ८ पदांच्या निर्मितीस उच्च स्तर सचिव समितीच्या मान्यतेच्या अधीन राहून मंजूरी दिली होती. त्यानुसार याबाबतचा प्रस्ताव उच्च स्तर सचिव समितीसमोर मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर समितीने दि. २५.०७.२०१४ च्या बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेनुसार मंत्रालय स्तरावरील एकूण ६ पदांच्या निर्मितीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार याबाबत पुढीलप्रमाणॆ निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान या केंद्रपुरस्कृत नवीन कार्यक्रमासाठी सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई या विभागाकरीता पुढील ६ पदांची निर्मिती करण्यास शासन मंजूरी देत आहे.

## मंजूर करण्यात आलेल्या पदांचा तपशील

| अ. क्र. | पद | वेतनश्रेणी (रू. मध्ये) | ग्रेड पे (रू. मध्ये) | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १. | अवर सचिव | १५६००-३९१०० | ६६०० | १ |
| २. | कक्ष अधिकारी | ९३००-३४८०० | ४८०० | १ |
| ३. | सहाय्यक | ९३००-३४८०० | ४३०० | १ |
| ४. | लिपिक टंकलेखक ( मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषेतील टंकलेखन/ श्रुतलेखन व संगणकाचे ज्ञान असलेले ) ( बाह्यस्त्रोताद्वारे ) | - | - | २ |
| ५. | चतुर्थश्रेणी कर्मचारी ( बाह्यस्त्रोताद्वारे ) | - | - | १ |
| | **एकूण** | | | **६** |

उपरोक्त ६ पदांवरील खर्च सन २०१४-१५ च्या आर्थिक वर्षातील मंजूर योजनेतर तरतूदीतून भागविण्यात यावा व तो पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मुख्य लेखाशीर्ष -मागणी क्र. आर २
२२५१ - सेक्रटरीएट - सामाजिक सेवा
०९०- सेक्रटरीएट
०१- मंत्रालय
(०१) (०१) सार्वजनिक आरोग्य विभाग
( २२५१ ०४१८ )

कृ.मा.प.

सामान्य प्रशासन विभागाने सदर नवनिर्मित पदांच्या नियुक्तीबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०३१५२९०१७०१७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Thombare Manohar S

Digitally signed by Thombare Manohar S
DN: CN = Thombare Manohar S, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = PHD
Date: 2014.09.03 16:49:10 +05'30'

**मनोहर ठोंबरे**
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

प्रत,

१) राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन मुंबई.
२) मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) उपमुख्यमंत्री, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण , मंत्रालय, मुंबई.
५) राज्यमंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग , मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव( सेवा) , सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) आयुक्त ( कुटुंब कल्याण ) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
१०) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
११) महालेखापाल ( लेखापरिक्षा) , महाराष्ट्र -१ मुंबई, महाराष्ट्र -२ नागपूर.
१२) महालेखापाल , लेखा व अनुजेयता , महाराष्ट्र -१ मुंबई, महाराष्ट्र -२ नागपूर.
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४) उपसचिव , सार्वजनिक आरोग्य विभाग ( सर्व) मंत्रालय, मुंबई.
१५) कक्ष अधिकारी ( आस्थापना ) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवडनस्ती ( आरोग्य-७).